सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मुख्यलेखाशीर्ष २०५२- सचिवालय सर्वसाधारण सेवा (००) (१०) माहिती तंत्रज्ञान संचालनालय (२०५२०४८२) (कार्यक्रम) खालील १७-संगणक खर्च या तपशीलवार शीर्षाखालील मंजूर अनुदानातून निधी वितरण करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्र.GAD-मातंसं ०२७/१३/२०२४/ई-७८६३६८

मादाम कामा मार्ग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२

दि. २६ मार्च, २०२५

**प्रस्तावना-**

ई-गव्हर्नन्स अंतर्गत राज्य शासनास आवश्यक असणाऱ्या तांत्रिक मनुष्यबळाचे वेतन, FMS अंतर्गत आवश्यक खर्च तसेच ई-गव्हर्नन्स अंतर्गत येणाऱ्या इतर बाबींवर होणारा खर्च माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून (२०५२०४८२) (कार्यक्रम) या लेखाशीर्षांतर्गत १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखालील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात येतो. सदर उद्दिष्टाखाली सन २०२४-२५ करीता तांत्रिक मनुष्यबळाच्या वेतनावरील खर्च भागविण्याकरिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून रु. ४८,०२,००,०००/- (अक्षरी रु.अठ्ठेचाळीस कोटी दोन लाख फक्त ) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८२/अर्थ-३ दिनांक २५.७.२०२४ च्या परिशिष्ट ३ मध्ये नमूद उद्दिष्टांसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाहीकरीता ( डिसेंबर २०२४ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत BEAMS प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे.

माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात तांत्रिक मनुष्यबळाच्या वेतनावरील खर्च भागविण्याकरिता (२०५२०४८२) (कार्यक्रम) या लेखाशीर्षांतर्गत १७- संगणक खर्च या उद्दिष्टाखाली मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत तरतूदीच्या मर्यादेत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने प्रस्तावित केल्यानुसार रु.४८,०२,००,०००/-(अक्षरी रु.अठ्ठेचाळीस कोटी दोन लाख फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने तांत्रिक मनुष्यबळाच्या वेतनावरील खर्च मागणी क्रमांक-ए-४, २०५२,सचिवालय सर्वसाधारण सेवा (००)(१०) माहिती तंत्रज्ञान संचालनालय (२०५२०४८२) (कार्यक्रम) १७- संगणक खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.५४/का.१४४३ दि.२८.०१.२०२५ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१२२/व्यय-४ दि.२१.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२६१८५७५८७८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDAM EKNATH ANDHALE

Digitally signed by SUDAM EKNATH ANDHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=257966df2620df1403d35023802519a4fbdcfcd894791eba41c2aef2b4c4b975, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B57FEE59F0E7101B822A49C72629C21BF9B4DC0BDE136817EE19B6B347E77F4, cn=SUDAM EKNATH ANDHALE
Date: 2025.03.26 18:59:21 +05'30'

**( सुदाम आंधळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत-

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई
२) महालेखापाल (लेखा परीक्षा) ,महाराष्ट्र-२ नागपूर
३) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) वित्त विभाग (व्यय-४) ,मंत्रालय, मुंबई
६) अर्थसंकल्प शाखा (सामान्य प्रशासन विभाग), मंत्रालय, मुंबई
७) संचालक,माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) निवडनस्ती